**बीम्स, डी.सी.पी.एस., सेवार्थ या प्रणालीच्या पासवर्डबाबतचे धोरण.**

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
शासन परिपत्रक क्र. संकीर्ण - १०१० / प्र. क्र. ७२ / कोषा प्र - ५
दिनांक: २० जुलै, २०११.

संदर्भ:- शासन परिपत्रक क्र. संकीर्ण - १०१० / प्र. क्र. ७२ / कोषा प्र - ५,
दिनांक: ६ डिसेंबर, २०१०.

**परिपत्रक:-** शासनाचे सर्व विभाग व अधिनस्त येणाऱ्या सर्व कार्यालयात बीम्स, डी. सी. पी. एस., सेवार्थ या प्रणालीद्वारे होणाऱ्या कामकाजाकरीता उपरोक्त संदर्भाधिन परिपत्रकान्वये पासवर्डबाबतचे धोरण निश्चित करण्यात आले असून ते दि.०१/०१/२०११ पासून लागू करण्यात आले आहे. सदर परिपत्रकातील परिच्छेद क्र. १.४ (अ. क्र. ३) मध्ये आहरण व संवितरण अधिकारी पासवर्ड विसरल्यास किंवा पाच वेळा चुकीचा टाकल्याने रद्द झाल्यास तो पुर्ववत करण्याचे अधिकार संबंधीत नियंत्रक अधिकाऱ्यांना देण्यात आलेले आहेत. परंतु, शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, बरेच तालुका / जिल्हा स्तरावरील आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडून पासवर्ड विसरल्यामुळे पासवर्ड रिसेट करण्यासाठी त्यांच्या संबंधीत नियंत्रक अधिकाऱ्यांशी संपर्क साधूनही पासवर्ड रिसेट करुन दिला जात नाही. त्यामुळे शासनाकडून मिळणारे अनुदान खर्च पडण्यास अडचणी निर्माण होतात.

पासवर्ड व्यवस्थितपणे लक्षात ठेवणे ही जबाबदारी संबंधीत आहरण व संवितरण अधिकाऱ्याची असून पासवर्ड विसरल्यास तो तत्परतेने रिसेट (Reset) करुन देण्याची जबाबदारी संबंधीत नियंत्रक अधिकाऱ्याची आहे. त्यामुळे पासवर्ड विसरल्यामुळे व तो रिसेट न करुन दिल्यामुळे शासनाकडून मिळणारे अनुदान खर्च न झाल्यास किंवा त्यासंबंधीत कोणतीही समस्या निर्माण झाल्यास संबंधीत आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रक अधिकारी जबाबदार राहतील. त्यामुळे पासवर्ड विसरल्यास आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी तात्काळ नियंत्रक अधिकाऱ्यांकडे पाठपुरावा करावा व नियंत्रक अधिकाऱ्यांनी पासवर्ड रिसेट करण्यास अधिक जागरुकता दाखवावी.

वरील सूचना संबंधीत प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिनस्त नियंत्रक अधिकाऱ्याच्या व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या कार्यालयाच्या निदर्शनास आणून द्याव्यात.

सदर शासन परिपत्रक शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक **संकेतांक २०११०७२०१५३४०४००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(स. अ. मु. नकवी)
उप सचिव तथा विशेष कार्य अधिकारी,
वित्त विभाग

प्रति,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे व उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र,मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा )-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा )-२, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (वाणिज्यिक लेखापरीक्षा ), महाराष्ट्र, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय, मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय ( मुळ शाखा ),मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय ( अपील शाखा ), मुंबई,
प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
सह संचालक, लेखा व कोषागारे, पुणे, नाशिक, नागपूर, अमरावती, औरंगाबाद, कोकण भवन, नवी मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/यांद्रे,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व कोषागार अधिकारी,
सर्व उपकोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, वित्त विभाग-कोषा प्र-५.

------